Mahajan 17-12-71

नामवंत गायक-गायिकांनी गाईलेलीं

# विविध-भावगीतें

भाग २ ला



स्वरसम्राज्ञी : लता मंगेशकर

आवृत्ति १२ वी : फेब्रुवारी १९७०

किंमत ३० पैसे

सेंट्रल प्रकाशन

७ पाववाला स्ट्रीट, मुंबई नं. ४

## 'विविध भावगीतां'च्या २ऱ्या भागाच्या निमित्तानें—
## दोन शब्द— !

मराठी रसिकवाचकांनीं, 'विविध भावगीतें' ह्या आमच्या नाविन्यपूर्ण प्रकाशनच्या एका भागावर अपार लोभ दाखविला. अल्पावधींतच आम्हांला पहिल्या भागाच्या दोन आवृत्त्या काढाव्या लागल्या. आमच्या वाचकांच्या आमच्यावरील ह्या अकृत्रिम लोभामुळेंच, आम्हांला 'विविध भावगीतां'चा २ रा भाग काढण्याची प्रेरणा मिळाली. दुसऱ्या भागांत, आम्ही पुन्हा गाजलेलीं जुनीं व नवीं भावगीतें, ध्वनिमुद्रित व रेडिओवर गाजलेलीं, वाचकांच्या आवडीला अनुसरून निवडून, संग्रहित केलीं आहेत. नामवंत गायकगायिका, ज्येष्ठ--श्रेष्ठ कवी, तसेच उदयोन्मुख गीतलेखक ह्यांच्या नांवांच्या यादीवरून आमची निवड आपल्या लक्षांत येईलच.

पहिल्या भागाप्रमाणेंच वाचक व भावगीतरसिक आमच्या ह्या दुसऱ्या भागाचें प्रचंड स्वागत करून, आम्हांला उपकृत करतील ही अपेक्षा.

आपला

**एफ्. बी. बुरहाणपूरवाला**

प्रकाशक सेंट्रल प्रकाशन

### —: कवि :—

(१) कै. भा. रा. तांबे
(२) कै "बी."
(३) राजकवी यशवंत
(४) बा.भ. बोरकर
(५) विंदा करंदीकर
(६) वसंत बापट
(७) पी. सावळाराम
(८) ग. दी. माडगूळकर
(९) श्रीकृष्ण पोवळे
(१०) अनिल भारती
(११) नामदेव व्हटकर
(१२) शांताराम आठवले
(१३) मधुकर जोशी
(१४) संत तुकाराम
(१५) संत एकनाथ
(१६ संत नामदेव
(१७) मुकुंदा विचारे

★

### कवियत्री

(१) संत जनाबाई
(२) संजीवनी मराठे
(३) इंदिरा सावंत

: प्रकाशक
एफ. बी. बुरहाणपूरवाला,
सेंट्रल प्रकाशन,
गावबाळा स्ट्रीट मु. नं. ४

-: मुखपृष्ठ छपाई: -
महाराष्ट्र प्रिंटरी
मुंबई ४.

—: मुद्रक :—
ए. एफ. बुरहाणपूरवाला,
महाराष्ट्र प्रिंटरी, सिम्प्लेक्स बिल्डिंग,
गावबाळा स्ट्रीट, मुं. नं. ४



### ह्या संग्रहांतील गायिका

★

(१) लता मंगेशकर
(२) आशा भोसले
(३) सुमन कल्याणपुर
(४) माणिक वर्मा
(५) सुलोचना चव्हाण
(६) गीता रॉय
(७) मोहनतारा आजिंक्य
(८) सरस्वती राणे
(९) यशोधराकुमारी
(१०) जानकी अय्यर
११) अमीर कर्नाटकी
(१२) मधुबाला जव्हेरी
(१३) प्रमोदिनी हजारे
(१४) मनोरमा बेहेर

★

### गायक

(१) सुधीर फडके
(२) आर. एन्. पराडकर
(३) बबन नावडीकर
(४) दशरथ पुजारी

# अनुक्रमणिका



## देवरूप होऊं सगळे

देवरूप होऊं सगळे, आम्ही एकीयाच्या बळें ॥ धृ० ॥

सप्तसागरा शक्ती, बिंदु बिंदु मिळता पाणी
एकजिव अणुरेणुची युगें युगें फिरते धरणी
प्रेमभाव स्वर्गी वचनी, पंचामुखीं ईश्वर बोले ॥ १ ॥

भूकबळ पक्षी धरतां, पारध्यानें टाकून जाळें
पंख गुंतवून पंखी एकरूप पक्षी झाले
गळ्यामध्यें घालून गळे, मृत्युलाच मारून गेले ॥ २ ॥

वाढवित भेदभावा, दुष्टतेचा फिरतो कावा
गांडुनिया भोळ्या जीवा, अंधारांत घालित घावा
चित्त नित्य सावध ठेवा, एक लक्षी लावून डोळे ॥ ३ ॥

## वेड लागलें त्या राधेला

जो तो सांगे ज्याला त्याला, वेड लागलें राधेला ॥ धृ० ॥

पितांबराची साडी ल्याली, मोरपिसांची करी काचोळी
वेळीअवेळी काजळकाळी, उटी लाविते मुखचंद्राला ॥ १ ॥

विळखा सुंदर कचश्रेणीचा, मुगूट चढविते फुलवेणींचा
हार अर्पिता मुक्तामणीचा, डोळे मोडित प्रतिबिंबाला ॥ २ ॥

डुबत अविरत यमुना डोही, राधेची ती कृष्णा होई
मिठी मारते ओलेती ही, शेषशाही भगवंताला ॥ ३ ॥

संगीत : वसंत प्रभू — गायिका : आशा भोसले

## अपुरें माझें स्वप्न राहिलें

अपुरें माझें स्वप्न राहिलें
कां नयनानों जागे केलें ? ॥ धृ० ॥
ओळख तुमची सांगुन स्वारी
आली होती माझ्या दारीं
कोण हवे हो म्हणतां त्यांना
दटावून मज, घरांत नेलें ? ॥ १ ॥
बोलत बसतां वगळून मजला
गुपित चोरटें ऐकूं कशाला ?
जाण्याचा ते करुनी बहाणा
गुपचुप माझ्या मनांत लपले ॥ २ ॥
नीज सुखाची तुम्हां लागली
मंद पाऊलीं स्वारी आली,
गोड खळीनें चहाडी केली
अंधारासी नच बोलु दिलें ॥ ३ ॥

## अजून नाहीं जागी राधा

अजून नाहीं जागी राधा, अजून नाहीं जागे गोकुळ
अशा अवेळीं पैलतीरावर, आज घुमे कां पावा मंजूळ...?
मावळतीवर चंद्र केशरी, पहाटवारा भंवती भणभण
अर्ध्या पाण्यामध्यें उभी ती, तिथेंच टाकून अपुले तनमन ॥
विश्वच अवघें ओंठा लावून, कुब्जा प्याली तो मुरली रव
डोळ्यांमधले थेंब सुखाचे, हे माझ्यास्तव, हे माझ्यास्तव ॥

कवियत्रि : इंदिरा संत

संगीत : दशरथ पुजारी  गायिका : सुमन हेमाडी

## ओळख पहिली गाली हंसते

ओळख पहिली गालीं हंसते !
सांग दर्पणा कशी मी दिसते ? ॥ धृ० ॥
आषाढीच्या तिन्ही सांजेला,
पैलतिरी त्या पाणवळ्याला,
बघुनि ज्याला जीव लाजला,
आठवण त्याची ह्दयीं ठसते ॥ १ ॥
नांव जयाचें घुमतां कानीं,
चित्र रंगतें मिटल्या नयनीं,
बाहुपाशीं जाता विरुनी
माझ्यावर मी जेव्हां रुसते ॥ २ ॥
करी बांगडी राज वारखी
नथणी बुगडी तुझ्यासारखी
तुझ्यापरि तो रत्नपारखी
म्हणुनि तुजला घडिघडि पुसते ॥ ३ ॥

गायिका : आशा भोसले संगीत : वसंत प्रभू

## पदीं घुंगुर माझ्या वाजती रे

पदीं घुंगुर माझ्या वाजती रे
मी तर माझ्या कृष्णाची, मी होऊन झाले दासी रे ॥
॥ पदीं.........
लोक बोलती मीरा वेडी-ज्ञाती म्हणे कुलनाशी रे ॥ १ ॥
राणाजी वीष प्याला देई-हांसत मीरा प्राशी रे ॥ २ ॥
मीरेचा प्रभू गिरिधर नागर-सहज मिळे अविनाशी रे ॥३॥
॥ पदीं......॥

कवि : श्रीकृष्ण पोवळे  गायिका : सुमन हेमाडी

## चांफा बोलेना

चांफा बोलेना, चांफा चालेना,
चांफा खंत करी कांही केल्या फुलेना ॥ धृ० ॥
गेलें आंब्याच्या वनीं
म्हटली मैनासवें गाणीं
आम्ही गळ्यांत गळे मिळवून रे
गेलों केतकीच्या वनीं
गंध दर्वळला वनीं
नागासवें गळालें देहभान रे
चल येरे येरे गड्या
नाचुं उडुं घालुं फुगड्या
खेळुं झिम्मा झिम् पोरी झिम पोरी झिम
हें विश्वाचें अंगण
आम्हां दिलें आहे आंदण रे
उणे करूं आपण दोघेजण रे
जन विषयाचे किडे
याची धांव बाह्याकडे
आपण करूं शुद्ध रसपान रे
चांफा फुलीं आला फुलुन
तेजी दिशा गेल्या आटुन
कोण मी—चांफा ? कोठे दोघेजण ? रे

कवि : कै. बी. तांबे [८] गायिका : लता मंगेशकर

## बहरला पारिजात दारीं

बहरला पारिजात दारीं
फुलें कां पडती शेजारीं ? ॥ धृ० ॥

माझ्यावरती त्यांची प्रीती, पट्टराणी जन तिजसी म्हणती
दुःख हे मरल्या संसारीं ॥ १ ॥

असेल कां हें नाटक यांचे, मज वेडीला फसवायाचे
कपट कां करिती चक्रधारी ॥ २ ॥

कां वाराही जगासारखा, तिचाच झाला पाठीराखा
वाहतो दौलत तिज सारी ॥ ३ ॥

## पहांट झाली उद्यानांतून

पहांट झाली उद्यानांतुन, मंदिरीं ये गारवा
जळते मी जळे दिवा ॥ धृ० ॥

वचन देउनी नाहीं आले, रातभरी मी रडुनि जागले
सुकली वेणी सुकला मरवा ॥ १ ॥

युद्धाविण हो रणीं पराजित, रुद्ध मनोरथ निराश मन्मथ
आणा चंदन उरीं सारवा ॥ २ ॥

ज्योत फिकटली हो अरुणोदय, पुरुष प्रणय हा केवळ अभिनय
स्त्री हृदयाची त्यास न परवा ॥ ३ ॥

शृंगाराचा लाथाडुनी घट, गोकुळांतला गेला खटनट
स्मृती तरी ग माझी हरवा ॥ ४ ॥

कवयित्री : सौ. माणिक वर्मा [९] गीत : ग. दी. माडगूळकर

## घेईं घेईं माझे वाचे

घेईं घेईं माझे वाचे, गोड नाम विठोबाचें
डोळे तुम्हीं घ्यारे सुख, पहा विठोबाचे मुख
तुम्हीं आईकारे कान, माझ्या विठोबाचे गुण
मना तिथें धांव घेई, राही विठोबाचे पायीं ॥ १ ॥
रूपीं गुंतलें लोचन, पायीं स्थिरावलें मन
देहभाव हरपला, तुज पाहतां विठ्ठला
तुका म्हणे जिवा, नको सोडूं या केशवा ॥ २ ॥

अभंग : संत तुकाराम  गायिका : सुमन हेमाडी

## हंसतील मजला

हंसतील मजला कबीर मीरा, हंसतील तुलसीदास
हरि तुझा छंद लागे मनास
उठे मनीचा क्षुद्र काम तो, कोठे अमृत आस ?
कुठें सरोवर कोठें तो, तुलना करूं कशाला ? ॥ १ ॥
नक्षत्रांकित चंद्र कुठे तो, कोठें सानुली कांच ?
कुठें स्वर्गीचा कल्पतरु अन् कोठें मरवा पाच ?
कबीर गाई, गाते मीरा, गाती तुलसीदास
गीत भावडे गाऊं कुणा मी, प्रभु घे तुझें तुलाच ॥ २ ॥

संगीत : सुधीर फडके

★






कळीदार कपुरी पान कोवळं छान केशरी चुना
रंगला काथ केवडा, वर्खाचा विडा घ्या हो मनरमणा
बारीक सुपारी निमचिकनी घालून
जायपत्री वेलची लवंग वरी दाबून
बांधले तसे या कुडींत पंचप्राण
घ्या रंगत करिं मर्दुनी चतुर्दशगुणी सख्या सजणा ॥
कमरेचा झुलता झोंक नूर बिनधोक उरीं मावेना
काजळी नजर छिनमिनी चांदणी रैना
छेडिता लालडी गुलाम तुमची गुलाम झालें सजणा
पायीं पैंजण छन्नक छना

संगीत : श्रीनिवास खळे



## जन पळभर म्हणतील हाय !

जन पळभर म्हणतील हाय हाय !
मी जातां राहील कार्य काय ? ॥ जन...

सूर्य तळपतील, चंद्र झळकतील
तारे आपुला क्रम आचरतील
असेच वारे पुढें वाहतील
होईल कां अंतराय ॥ १ ॥

मेघ वर्षतील, शेतें पिकतील
गर्वानें या नद्या वाहतील
कुणा काळजी की न उमटतील
पुन्हां तटावर हेच पाय ॥ २ ॥ जन...

सखे सोयरे डोळे पुसतील
पुन्हा आपल्या कामीं लागतील
उठतील, बसतील हंसुनी खिदळतील
मी जातां त्यांचें काय जाय ? ॥ ३ ॥ जन...

अशा जगास्तव काय कुढावें ?
मोहि कुणाच्या कां गुंतावें ?
हरिदूत कां विन्मुख व्हावें ?
कां जिरवूं नये शांतीत काय ? ॥ ४ ॥ जन...

●



## घरोघरीं वाढदिन

घरोघरीं वाढदिन, माझ्या वडिलांचा आला
बारा मास, सहऋतु अर्पिती वर्षमाला ॥ धृ० ॥

देह चंदनाची काठी झिजे ज्यांची लेकीसाठीं,
सेवा साफल्याची उटीं लाविते पितृत्वाला ॥ १ ॥
डोळीयांच्या ओंजळींत तुडुंबली पाणगंगा,
प्रेमाच्या तूं पांडुरंगा चला उठा आंघोळीला ॥ २ ॥
सोडा आतां उपवास लेक झाली मिळवती
घ्या हो घांस माझे हातीं वर्षांच्या ह्या दिवाळीला ॥ ३ ॥

★

कवि : पी. सावळाराम संगीत : वसंत प्रभू

## तें दूध तुझ्या त्या घटांतलें

तें दुध तुझ्या घटांतलें,
कां अधिक गोड लागे न कळे ? ॥
साईहुनि मऊमऊ बोटे तीं झुरुमुरु झुरुमुरु धार काढिती
रुणुझुणु कणकण करिती गीतीं, कां गान मनांतील त्यांत मिळे ? ॥
अंधुक श्यामल वेळ टेकडी, झरा, शेत, तरु मधे झोपडी,
त्यांची देवी धारही काढी, कां स्वप्नभूमि बिंबुनि मिसळे ? ॥
या दृश्याचा मोह अनावर, पाय ओढुनी आणि सत्वर
जादु येथची पाझरे मजवर, कां दूध गोडही त्याचमुळें ? ॥

●

## ज्ञानदेव गेले तेव्हां

ज्ञानदेव गेले तेव्हां कोसळली भिंत
वेद झाले रानभरी गोंधळले संत
ज्ञानदेव गेले तेव्हां आटे इंद्रायणी
मराठीच्या वडातळीं जळूं लागे पाणी ॥ १ ॥

ज्ञानदेव गेले तेव्हां ढळला निवृत्ति
आसवांच्या डोही झाली विझूं विझूं ज्योती
ज्ञानदेव गेले तेव्हां तडा वीटे गेला
बाप रखमादेवीवरु कटींत वाकला ॥ २ ॥

ज्ञानदेव गेले तेव्हां वापुडला नामा
लागोपाठ भावंडें ती गेलीं निजधामा
माझ्या ज्ञानराजा तें रे कळों आलें आज
भर दुपारीं ही तशी झाली तीनसांज ॥ ३ ॥

तेव्हांच्या सारखा पुन्हां बावला मोगरा
भुईभर झाल्या कळ्या तुटला आसरा
इथें आळंदीत आंत ऊर मात्र फाटे
पंढरीच्या वाटेतही बाभळीचे कांटे ॥ ४ ॥



## असेंच होतें म्हणायचें तर

असेंच होतें म्हणायचें तर......
अशी अचानक भ्यालिस कां—?
अर्ध्या वाटेवरती जाऊन
परत पुन्हां तूं आलीस कां ? ॥ १ ॥

असेंच होतें म्हणायचें तर......
वरवर फसवे हसलीस कां ?
स्वप्नाला चुरडून मिठींतच
पुन्हां तयावर रुसलीस कां ? ॥ २ ॥

असेंच होतें म्हणायचें तर......
उगाच खोटें रडशील कां ?
भरांत येऊन भलत्यासलत्या
घरांत माझ्या शिरलीस कां ॥ ३ ॥

असेंच होतें म्हणायचें तर......
अशी जीवाला डसलीस कां ?
केस मोकळे ओले घेऊन
वणव्यामध्यें घुसलीस कां ? ॥ ४ ॥

## जा सांग लक्ष्मणा

जा सांग लक्ष्मणा सांग रामराजाला
समजला म्हणावें न्याय तुझा सीतेला
अग्नींत घेतली उडी, उजळली कुडी
पटविलें तेव्हां होतास तूं देवा

केलास न्याय परी उलटा, ठरवूनी कुलटा
केलीस सफल मम सेवा
शोभले तुझ्या वंशास, दिगंत यशास चढेल तजेला
समजला राघवा न्याय तुझा सीतेला ॥ १ ॥ जा सांग...

जा सांग जानकी अजून राही जिवंत
तो रघुवंशाचा अंश तिच्या उदरांत
तोंवरी प्राण कोंडीन क्षुद्र देहांत
राणीची भिकारीन आज, होय रघुराज । तिला सांभाळा
मिळाला राघवा न्याय तुझा सीतेला ॥ २ ॥ जा सांग...



गायिका : गीता दत्त [ रॉय ]          गीत : वसंत बापट

## नामयाच्या जनीपरी

नामयाच्या जनीपरी, तुज वाहते लाखोली ॥
पंढरीच्या पांडुरंगा शीर फोडीते पाऊली ॥ १ ॥ नामयाच्या...
अशी काय आगळीक तुझ्या घरीं सांग ना केली ?
बोहल्याच्या पायरीशीं माझी बांगडी फोडली ॥२॥ नामयाच्या...
आईबापाची पुण्याई कुठें कशी कमी झाली
वेल आहे वचनाची पेन चैत्रांत जाळली ॥ ३ ॥ नामयाच्या...
कसा केलास शेवट सुरवात जों न झाली
बांधतांना तोडलीस पोत माझ्या गळ्यांतली ॥४॥ नामयाच्या...

गायिका : अमीर कर्नाटकी     गीत : ग. दि. माडगूळकर

## शपथ तुला प्रेमा

१

शपथ तुला प्रेमा, नको त्या मंदिरांत जाऊं
यौवन मंदिर नाम तयाचें
मायावी तें कसब मयाचें
लोभस कपटी शोभा इथली
चुकून नको पाहूं ॥ १ ॥ नको त्या...
दिसते तैसे येथें नाहीं
आसन दिसते तेथें खाई
अपघाती ह्या सोपानावर
पाय नको ठेवूं ॥ २ ॥ नको त्या...
या या म्हणती जरी युवराजे
हंसूच करतील तुझें नि माझें
बाळपणींच्या झोपडींत ये
जन्मभरी राहूं ॥ ३ ॥ नको त्या...

गायिका : सौ. आशा भोसले    गीत : ग. दि. माडगूळकर

## आई

आई म्हणोनी कोणी--आईस हांक मारी
ती हांक येई कानीं--मज होय शोककारी ॥ १ ॥

नोहेच हांक माते--मारी कुणा कुठारी
आई कुणा म्हणूं मी--आई घरीं न दारीं ॥ २ ॥

चारा मुखीं पिलांच्या--चिमणी हळूंच देई
गोठ्यांत वासरांना--ह्या चाटतात गाई
वात्सल्य हें बघूनी--व्याकूळ जीव होई ॥ ३ ॥

येशील तूं घराला--परतून केधवा गे ?
रुसणार मी न आतां--जरी बोलशी रागे
आई कुणा म्हणूं मी--आई घरीं न दारीं
स्वामी तिन्ही जगाचा--आईविना भिकारी ॥ ४ ॥

गा. : लता मंगेशकर गीत : राजकवि यशवंत संगीत : वसंत देसाई

## राजघाट

राजघाट ! राजघाट......
हिंसेच्या भंवताली अहिंसेचा दिव्य घाट ॥ धृ० ॥

रक्ताचे ते ओघळ ते सुकले कां ना अजून ?
गरीबांचा नारायण झोपला इथें दमून
शांतीच्या स्वर्गाची हीच एक पायवाट ॥ १ ॥ राजघाट......

खिस्ताच्या छातीवर तीन खिळे ठोकले
बुद्धाच्या पायांवर नम्र शीर वांकलें
मरणाची मान कधीं झाली येथें न ताठ ॥ २ ॥ राजघाट......

'गीते' च्या घडणीवर ही समाधी बांधली
'भक्ती' अन् 'मुक्ती' पण एकठाई बांधली
शांतीदूत येथेंची वांकतात ॥ ३ ॥ राजघाट......

गायिका : प्रमोदिनी हजारे



गीत : अनिल भारती

## नकळत होते तुझी आठवण

नकळत होते तुझी आठवण ॥ धृ० ॥

कळ्या फुलांना हळूंच हंसवीते
प्रेमळ निर्मळ उषा उगवते
दिवसाचे ते बघुन बालपण ॥ १ ॥ नकळत

हास्याचा कल्लोळ भोंवती
भोजन करीतां भरल्या ताटीं
घांस अडकतां उचकी लागुन ॥ २ ॥ नकळत...

सारे प्रीतिचें स्वप्न कोंवळें
दोन सानुले विहग पांगले
चित्रपटांतील प्रसंग पाहून ॥ ३ ॥ नकळत...

करुनी जागरण कलिका सुकली
म्लान मुखानें घरी निघाली
चंद्रकोर गगनांतली देखून ॥ ४ ॥ नकळत...

गायक व संगीत : सुधीर फडके गीत : अनिल भारती

## लाविते भाळी

लाविते भाळीं तुझीया पाऊलांची धूळ रे
घेई माझ्या अंतरीची एकदां चाहूल रे ॥

होऊं दे साकार स्वप्न पाहूं दे मांगल्य तें
वाहते चरणांवरी ह्या जीवनाचें फूल रे ॥

वंचनेची रात काळी संपली, आली उषा
हांसली आशा प्रीतिची, पांघरूनी झूल रे ॥

पापण्यांना स्तब्ध राहूं दे तुझीया चिंतनीं
कां पडावी सांग राया, मन्मनाला भूल रे

गायिका : सुलोचना कदम



गीत : अनिल भारती




जरा थांबवा रघुरायाला
धाडूं नका ग राम वनाला ॥

लाथ मारूनी राज्यपदाला
जगण्यास निज कर्तव्याला
सत्यवचन कां पाळण्याला
कौसल्येचा पुत्र निघाला ॥ १ ॥ धाडूं नको...

ठेवून मागे आठणीला
पावित्र्याच्या पायधुळीला
रघुवंशाच्या पुण्याईला
नका पाठवूं वनवासाला ॥ २ ॥ धाडूं नको...



## जळो रे तुझी होरी

जळो रे तुझी होरी
कान्हा नको करूं बळजोरी । मी सासुरवासिनी नारी
आधींच तुजसी उल्हास । अजि आला फाल्गुन मास
पिचकारी उधळि रसरंग । करित झकझोरी ॥ धृ० ॥
केलि जाळपोळ ती पुरे । फोडिले दुधाचे डेरे
हरलिस विकल अंतरें
तुझी लगट येईल अंगलट मनाची चोरी ॥ १ ॥
नको टाकूं केशरी रंग । भिजेल रे चिर चिर अंग
भाई भारीच ग श्रीरंग
लागला जिवाला घोर । संशयी भारी तिकडील स्वारी ॥ १ ॥

## घनश्याम पाहिला मी

घनश्याम पाहिला मी, घनश्याम पाहिला
दहिंदूध लोणी हळूच चोरीले
उखळाला मग तया बांधिले
धडपडती ते हात चिमुकले
तो बाळकृष्ण पाहिला ॥ १ ॥ घनश्याम...
मोरपिसांचा मुकुट शोभतो
अधरीं पांवा मधुर वाजतो
गोपगोपिका सर्व नाचतो
मुरलीधर मी पाहिला ॥ २ ॥ घनश्याम...
मेघासम तो शाम सांवळा
हृदयमंदिरीं माझ्या लपला
स्वप्नीं दिसला मधुर हंसला
मनमोहन मी पाहिला ॥ ३ ॥ घनश्याम...




आज पुनवेचं चांदणं फुललं,
मन प्रीतिच्या ओढीनं भुललं ॥

कोण हळूंच कानांत बोललं
'दोन जीवाचं नातं जुळलं'
अंग अंग खुशीनं शहारलं ॥ १ ॥ मन...

नका सांगूं गुपित हें मनांतलं
अजून नाहीं कुणी तें ओळखलं
गोड बोलून कसं मला जिंकलं ॥ २ ॥ मन...

तुझ्या डोळ्यांच्या ऐन्यांत पाहिलं
मीच मजला कितीदां न्याहाळलं
नव्या नवतीचं रूप दिसूं लागलं ॥ ३ ॥ मन...

●

गायिका : सुलोचना चव्हाण (२२) गीत : अनिल भारती

## पुन्हां दगा देणार कां....?

आज इथें आलांत, उद्यां नि रोज इथें येणार कां ? ॥ ध्रु० ॥

काल दिला पण उद्यां तैसा—पुन्हां दगा देणार कां ? ॥
आतुरतेनें पहा थांबले
वाट सारखी पाहुं लागले
तुमच्यासाठीं रात्र जागले
काल कसोटी घेतलीत पण, उद्यां तशी घेणार कां ? ॥१॥ पुन्हां दगा
एकटीच मी जीव घावरा
कुठें मुळीं ना मला निवारा
उरला नाही सांदीकोपरा
काल जसे गेलात अचानक, उद्या तसे जाणार कां ? ॥२॥ पुन्हां दगा
निळे निळे हे लबाड डोळे
नव्हेत डोळे फसवे जाळे
सदांकदां हे असले चाळे
काल अशानें फसगत झाली, उद्यां तशी होणार कां ? ॥३॥ पुन्हां

गायिका : प्रमोदिनी हजारे गीत : अनिल भारती

## तूं वृंदावन मी चिरी

तूं वृंदावन मी चिरी—तूं तुळशी मी मंजिरी ॥
तूं पावा मी मोहरी—स्वयें दोन्ही ॥
तूं चांद मी चांदणी—तूं नाग मी पद्मिनी
तूं कृष्ण मी रुक्मिणी—स्वयें दोन्ही ॥
तूं नदी मी थडी—तूं तारूं मी सांगडी
तूं धनुष्य मी भातोडी—स्वयें दोन्ही
तूं वेद मी स्तविता—तूं शास्त्र मी गीत
तूं गंध मी अक्षता—स्वयें दोन्ही
नामा म्हणे पुरुषोत्तमा—स्वयें जडलों तुझ्या प्रेमा
तूं कुडी तूं आत्मा—स्वयें दोन्ही ॥

गायक : दशरथ पुजारी (२३) गीत : संत नामदेव

## ही रात्र ढळावी

ही रात्र ढळावी अशाच अंधारांत
पण भाव कळावा चंद्राच्या नयनांत ॥ १ ॥

मी तव खांद्यावर टाकून आहे मान
ही सरेल सोबत येतां धुंद पहांट ॥ २ ॥

आतांच किरण ते येतील चोळीत डोळे
वाराही वाहील गोड भूपाळी गात ॥ ३ ॥

मी असेन जेव्हां रात्रींच्या गर्भात
दंव थेंब शहारून विरतील कमलदलांत ॥ ४ ॥

मग प्राचीवरचा रंग मला चढणार
रजनीची नागिण टाकील तेव्हां कात ॥ ५ ॥

गायिका : यशोधराकुमारी गीत : अनिल भारती संगीत : चंद्रकांत

## आशय आहे खोल

ह्या मूकपणांतच आशय आहे खोल
ह्या सुंदरतेचें कसें करावें मोल ? ॥ धृ० ॥
डोळ्यांत तुझ्या ग व्यथाच मूर्तिमंत
कां शब्द अडावा ? कां दाटावा कंठ ?
कां देवापुढती झाली ज्योत अबोल ? ॥ १ ॥ ह्या निर्धनतेचे
आंसूनें कां तव लिहिली जीवन गाथा ?
पण तरीहि उन्नत शालीनतेचा माथा
घडविल इतिहासा ह्या गाथ्यांतील ओळ ॥ २ ॥ ह्या निर्धनतेचे
दरवळे अजून तव मंगल स्नेह सुवास
हातांत अजून बघ उरला अर्धा घास
सांवरशिल कां, जर सुटला माझा तोल ॥ ३ ॥ ह्या निर्धनतेचे

गा. : यशोधराकुमारी गीत : अनिल भारती संगीत : मधुकर पाठक

## लबाड तुमची जात

बाई बाई लबाड तुमची जात
दिवसांकांठीं जगावेगळे रंग बदला सात ॥ बाई...
वेध मनाचा चटकन घेता
कितीक फसवी वचनें देता
पसरून जाळें, फसवून करता, खुळ्या जीवाचा घात ॥ २ ॥ बाई...
दगडाला पण सुंदर म्हणता
सुंदरतेला सहज लाजता
पटवून घ्याया, हटकून धरता, शीलवंतीचा हात ॥ २ ॥ बाई...
हंसून खेळून जीव लाविता
आकाशांतला चंद्र दाविता
सरकून येता, जुळवून घेता, अखेर करता मात ॥ ३ ॥ बाई...

गायिका : सुलोचना चव्हाण  गीत : अनिल भारती

## नका विचारूं पुन्हां पुन्हां



नको विचारूं पुन्हां पुन्हां ।
कसं लागलं काजळ बाई,
तिकडच्या ओठांना ॥ नका...
दीप लावण्या माडीवरी
एकटी गेले कशीतरी
माहित मजला कुठेंतरी
लपली होती हो स्वारी
नका विचारूं पुन्हां पुन्हां ?
ओलांडूनि मी उंबरठा
पहिलें पाऊल टाकलें
नकळत बाई कुणीतरी
डोळे मागुन झांकले, नको
विचारूं पुन्हां पुन्हां ॥ २ ॥

●

गायिका : सौ. सुलोचना चव्हाण गीत : मधुकर रानडे

## वाट पहाते मी डोळा

वाट पहाते मी डोळां--कां गा न येसी विठ्ठला ॥ धृ० ॥
तूं वो माझी नीज जननी--मज कां टाकियेले वनीं ?
धीर किती धरूं आतां ?--धांव घाली पंढरीनाथा ।
मला आवड भेटीची--धनी होईन पायाची
सर्व जीवांचे स्वामिनी--म्हणे जनी माय--बहीणि

गायिका : सौ. मोहनतारा अजिंक्य  कवियित्री : जनाबाई

## उभी जानकी स्वयंवराला

उभी जानकी स्वयंवराला
परी थरथरते ही वरमाला
कालच बांधूनी मानस पूजा
मंदिरीं वरिला श्री रघुराजा
आज पाहुनी श्यामल तेज
दिपुनी गेली मिथिल बाला ॥ १ ॥ उभी जानकी...

जनकांनी पण--पण लावियला
वांकवील जो शिवचापाला
वैदेही ही वरिल तयाला
उठ राघवा उद्धराया शिला ॥ २ ॥ उभी जानकी

तोंच राघवें चाप उचलिला
वैदेहीनें श्वास रोखिला
धुनभंग निमिषांत जाहला
शुभमंगल झालें त्याच घडीला ॥ ३ ॥ उभी जानकी...

●

गायिका : माणिक वर्मा  गीत : बाबुराव गोखले

## ये गोविंदा—ये गोपाळा

ये गोविंदा, ये गोपाळा । दर्शन दे तूं या राधेला
जिनें कडेवर तुजला घेऊन
रोज दाविले गोकुळ मिरवून
दहींभाताचा घांसही चारून
लहानाचा तुज मोठा केला ॥ १ ॥ ये गोविंदा...

यौवन फुलती, तुझीयावरती
जिने उधळली पुष्पक प्रीती
जनलज्जेची टाकून भीती
तुझ्या संगती काळ वेंचला ॥ २ ॥ ये गोविंदा...

तूंच जाता गोकुळ सोडून
मोहपाश ते अवघे तोडून
प्रपंच घर ही आलें मोडून
जोगीन होऊन प्रभूपदाला ॥ ३ ॥ ये गोविंदा...

•

गायिका : मधुबाला जव्हेरी  गीत : पी. सांवळाराम

## मुक्या मनाचे बोल

मुक्या मनाचे बोल झाले फोल ॥ ध्रु० ॥
चंदेरी दर्यांत वितळल्या सोनेरी तारा
पानांच्या कानांत कुजबुजे हलके हलके वारा
सुनासुना किती शांतशांत अन् होता सर्व किनारा
पिकल्या फळांत, चोंच खुपसून तोंच
उडून जाय चंडोल ॥ १ ॥ मुक्या...

हृदयाच्या एकांतात नांव तुझे मी आठवते
दो नयनांच्या पेन्यांत चित्र तुझें मी सांठवते
निःश्वासाच्या कवनांत पत्र तुला मी पाठवते
सखया तुझ्याशिवाय भरेना हाय
जखम उरांत खोल ॥ २ ॥ मुक्या...

गायिका : गीता दत्त ( रॉय ) गीत : वसंत बापट

## पाणीयासी कैसि आतां

पाणीयासी कैसी आतां एकली मी जाऊं?
वाटेमध्यें उभा कान्हा काय त्यासी देऊं? ॥
कुंभ घेऊनीया शिरीं
जात होते यमुना तिरीं
वाटेमध्यें उभा हरी, काय त्यासी देऊं? ॥ १ ॥
मुरली घेऊनिया करीं
वाजवितो तो श्रीहरी
नाद येतो कवण्याद्वारीं कोठें त्याला पाहूं ? ॥ २ ॥
जिकडे पाहे तिकडे हरी
हरिर्विण दुजें नाहीं
एका जनार्दनी माझे आई, कृष्णा कोठें पाहूं ? ॥ ३ ॥

कवि : संत एकनाथ  गायिका : सौ मोहनतारा अजिंक्य

## गुरुदत्त पाहिले कृष्णातिरीं

गुरुदत्त पाहिले कृष्णातिरीं,
शतदीप उजळले माझ्या उरीं ॥ गुरुदत्त...
चरण क्षाळित कृष्णामाई
छत्र तरूंची शीतल राई
गोड आरती खगगण गाती
भुलली स्वर्गपुरी ॥ १ ॥ गुरुदत्त...
यतिवेषें गुरुमूर्ति शोभली
अपार करुणा हृदयीं भरली
सूर्य चंद्रमा नयनीं, वदनीं
शांती--युगें साजिरीं ॥ २ ॥ गुरुदत्त...
प्रभुरायाची शुभद पाऊलें
सेवाया सुर भूवर आले
माझ्या नयनांमधुनी झरती
प्रेमाश्रूंच्या सरी ॥ ३ ॥ गुरुदत्त...

गायक : आर. एन्. पराडकर    संगीत : सुधांशु

## जन्मोजन्मीं तुम्हीच यावें

जन्मोजन्मीं तुम्हीच यावें माझ्या संसारीं
एकच आशा सदैव राहील अखेरची ह्या उरीं ॥
अलंकार सोन्याचे मजला, नकोत माणिकमोती
शपथ गळ्याची तुमच्या, माझी घ्यावी पुरी कसोटी
महालांत जन्मलें, वाढलें वैभवांत जरी ॥ १ ॥ जन्मोजन्मी...



सलेल कांटा पायीं तुमच्या, होतील मज यातना
कशी कळावी भगवंताला भक्ताची भावना ?
येऊंद्या संकटें कितीही राहीन मी हांसरीं ॥ २ ॥ जन्मोजन्मी

मंगल सौभाग्याचा ठेवा, तुमच्या चरणांमधीं
अखंड वाहील प्रातिची कां निर्मल गंगानदी ?
युगायुगाच्या गांठीभेटी पडतील वरचेवर ॥ ३ ॥ जन्मोजन्मी...

●

गायिका : सुलोचना चव्हाण    गीत : अनिल भारती

## अभागिणीचें एक मागणें

अभागिणीचें एक मागणें
पंचप्राण पदरांत टाकणें
नको हिरावू नकोस नेऊं
सौभाग्याचें माझें लेणें ॥ १ ॥ अभागिणीचें...

सूर्य निघाला मावळतीला
यमराजा तूं पाश फेकीला
आयुष्याची तुटली शाखा
क्षणांत सरलें त्याचें जीणें ॥ २ ॥ अभागिणीचें...

'फीर माघारी' म्हणशी देवा
जाऊं कशी हा सोडून ठेवा ?
'पुत्रवती भव' दिलास वर कां ?
दे माघारीं माझें देणें ॥ ३ ॥ अभागिणीचें...

●

गायिका : सौ. सुलोचना राणे        गीत : अनिल भारती

# नयनज्योत उजळुनी

नयनज्योत उजळूनी
मी तुलाच शोधिते
भंगल्या उरांत आठवण
तुझीच जागते ॥
आज पराभूत मी,
जिंकण्यास ये मला
मी तुझीच होते मग
कापलास कां गळा ?
वाटा आतां चालण्यास
साथ तुझी मागते ॥ १ ॥

त्या खुणा पुसूं कशा ?
उमटल्यात अंतरीं
जळते वंचनेत मी,
मूक पांखरापरी
मरणयातना कठोर
रोज रोज भोगते ॥ २ ॥

•